कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा सन २०१९-२० चा अनुसूचित जाती प्रवर्गाचा अखर्चित असलेला उर्वरित रू. ८ कोटी निधी पुनर्जीवित करून सन २०२१-२२ मध्ये वितरीत करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०५२०/प्र.क्र.५४ (भाग-२)/१४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०२२

**संदर्भ:-**

१) शासन परिपत्रक: वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
२) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. ३-१ (Revalidation)/२०१५- M&T (आय ॲण्ड पी), दि. २२ एप्रिल, २०२०
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.यां.उ.अ/२०२०-२१/गुनि-५/१२६८/२०२०, दि.११ मे, २०२०.
४) सामाजिक न्याय विभागाचा शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२२/प्र.क्र.३३/अर्थसंकल्प (विघयो), दि. ३१ मार्च, २०२२

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत- कृषी यांत्रिकीकरण उप- अभियान राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सन २०१९-२० या वर्षासाठी केंद्र शासनाने रु. ७५ कोटी निधी उपलब्ध करुन दिला होता, त्यापैकी केंद्र हिश्श्याचा रू. ३ कोटी निधी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. २० एप्रिल, २०२० रोजीच्या पत्रान्वये पुनर्जीवित करून दिलेला आहे. सदर निधीचे तसेच या योजनेतंर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राज्य हिश्श्याचा रू. ५ कोटी निधीचे वितरण अद्याप बाकी होते. सबब, सदर केंद्र हिश्श्याचा रू. ३ कोटी व राज्य हिश्श्याचा रू. ५ कोटी असा एकूण उर्वरित रू. ८ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

**१.** कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१९-२० या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.३ कोटी (रुपये तीन कोटी फक्त) व राज्य हिश्श्याचा रु. ५ कोटी (रुपये पाच कोटी फक्त) असा एकूण उर्वरित रु. ८ कोटी (रुपये आठ कोटी फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२. सदर वितरीत रू. ८ कोटी निधी केंद्र व राज्य हिस्स्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक- एन - ३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)७८९ - अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना,<br>(०१)(११) कृषी उन्नती योजना-कृषी यांत्रिकीकरण उपअभियान<br>(कें.पु.यो)(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१बी१८८), ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक- एन - ३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)७८९ - अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना,<br>(०१)अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना,<br>(०१)(१२) कृषी उन्नती योजना-कृषी यांत्रिकीकरण उपअभियान<br>(कें.पु.यो) (राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ बी१९७), ३३ अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेल्या रू. ८ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वितरीत केलेला रू. ८ कोटी निधी कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Single Nodal Account (SNA) मध्ये जमा करावा आणि तद्नंतर सदर निधी PFMS द्वारे जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांकरिता उघडलेल्या Child Account द्वारे अनुसूचित जाती प्रवर्गातील लाभार्थ्यांवर खर्ची टाकावा.

५. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजुरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

६. उपलब्ध निधी फक्त अनुसूचित जाती/नवबौद्ध प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचा अनौ. संदर्भ क्र. ४०४/व्यय-१४, दि. २९ मार्च, २०२२ अन्वये व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णय दि. ३१ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३१११२०२३९८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.03.31 17:09:45 +05'30'

**(श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे,
७. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई,
८. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१०. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
११. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
१२. वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई,
१३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१४. निवड नस्ती (१४-अे).